20110706140238001

प्रादेशिक योजना - कोल्हापूर इचलकरंजी
महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम - २०(३) अन्वये मौजे तळसंदे, ता.हातकणंगले येथील ग.नं.८५, १९९ व २०० या जमिनी शेती/ना विकास विभागातून वगळून सार्वजनिक/ निमसार्वजनिक विभागात समाविष्ट करणेबाबतची सूचना.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
शासन निर्णय क्रमांक - टिपीएस २१११/१४/प्र.क्र.५९/२०११/नवि-१३
दिनांक :- २६ मे, २०११

शासन निर्णय :- सोबतची शासकीय अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिध्द करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने ,

( सुनिल मरळे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे
विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
जिल्हाधिकारी, कोल्हापूर
उपसंचालक, नगर रचना, पुणे विभाग, पुणे
( यांना विनंती की, मंजूरीच्या अनुषंगाने अधिप्रमाणित करावयाचे भाग नकाशे ५ प्रतीत पाठविण्यात यावेत तसेच प्रस्तुत सूचना शासनाच्या दि.१३/०९/२०१० रोजीच्या परिपत्रकातील निदेशानुसार व खालील सूचनांप्रमाणे जाहिरात म्हणून प्रसिध्द करून घेणेबाबत सत्वर कार्यवाही करावी.
१.जाहिरात देणाऱ्या कार्यालयाचे नांव - नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
२.जाहिरात कोणत्या दिनांकापर्यन्त द्यावयाची आहे - तात्काळ.
३.प्रसिध्दीचे स्वरूप -सर्वाधिक खपाच्या स्थानिक वृत्तपत्रात
४.कोणत्या जिल्हयात -कोल्हापूर
५.किती वृत्तपत्रात -एका इंग्रजी व एका मराठी वृत्तपत्रात

पुढे...

| | |
|---|---|
| ६.वृत्तपत्राचे नांव | -सर्वाधिक खपाच्या स्थानिक वृत्तपत्रात |
| ७.कितीवेळा | -एकदा |
| ८.जाहिरात खर्चाचे देयक कोणत्या अधिकाऱ्याकडे पाठवावयाचे | -संचालक, नगररचना महाराष्ट्र राज्य, पुणे |

सहाय्यक संचालक, नगर रचना, कोल्हापूर शाखा, कोल्हापूर

व्यवस्थापक, येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे

( त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची शासकीय अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्र भाग १, पुणे विभाग, पुणे पुरवणी भाग-१ मध्ये प्रसिध्द करून त्यांच्या प्रत्येकी ५ प्रती या विभागास, संचालक, नगररचना महाराष्ट्र राज्य, पुणे, जिल्हाधिकारी, कोल्हापूर, उपसंचालक नगर रचना पुणे विभाग पुणे व सहाय्यक संचालक नगर रचना कोल्हापूर शाखा, कोल्हापूर, यांना पाठवाव्यात )

कक्ष अधिकारी (नवि-२९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

यांना विनंती की, सदरची अधिसूचना या विभागाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करणेत यावी.

निवडनस्ती ( नवि १३ )

**सूचना**
**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : २६ मे, २०११**

क्रमांक-टिपीएस २१११/१४/प्र.क्र.५९/२०११/नवि-१३

महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम १९६६

ज्याअर्थी, कोल्हापूर इचलकरंजी प्रदेशाची प्रादेशिक योजना (यापुढे जिचा उल्लेख " उक्त प्रादेशिक योजना" असा करण्यात आला आहे) राज्य शासनाच्या नगर विकास आणि सार्वजनिक आरोग्य विभागाकडील अधिसूचना क्र.आरपीके - ११७६/२७८२/युडी-५, दिनांक २० एप्रिल, १९७८ (यापुढे जिचा उल्लेख " उक्त अधिसूचना" असा करणेत आला आहे.) अन्वये मंजूर केली असून ती दिनांक १ नोव्हेंबर १९७८ पासून अमंलात आली आहे;

आणि ज्याअर्थी, उक्त प्रादेशिक योजनेच्या प्रस्तावानुसार मौजे तळसंदे, ता.हातकणंगले येथील ग.नं.८५, १९९ व २०० (यापुढे ज्यांचा उल्लेख 'उक्त जमिनी' असा करण्यात आला आहे.) या जमिनी 'शेती/नाविकास' विभागात (यापुढे ज्यांचा उल्लेख 'उक्त विभाग' असा करण्यात आला आहे.) समाविष्ट आहेत;

आणि ज्याअर्थी, डॉ.डी.वाय.पाटील एज्युकेशन सोसायटी, कोल्हापूर यांनी मौजे तळसंदे, ता.हातकणंगले येथील ग.नं.८५, १९९ या जमिनीवर शैक्षणिक वापर करण्यासाठी त्या उक्त विभागातून वगळून 'सार्वजनिक/निमसार्वजनिक' विभागाल समाविष्ट करण्याची दि.११/०१/२०११ च्या पत्राने विनंती केलेली आहे; तसेच गट नं.२०० च्या ७/१२ उताऱ्याप्रमाणे मालक सदरी नोंद असलेल्या व्यक्तींचे संमतीपत्र दि.०८/०२/२०११ अन्वये सदर सोसायटीने सादर केले आहे.

आणि ज्याअर्थी, उक्त जमिनीचा समतोल विकास होण्यासाठी उक्त जमिनी सोबतच्या नकाशात दर्शविल्याप्रमाणे उक्त विभागातून वगळून शैक्षणिक कारणाकरीता सार्वजनिक/निमसार्वजनिक विभागात खालील अटीस अधिन राहून समाविष्ट करणे आवश्यक आहे, असे शासनाचे मत झाले आहे.

१. विनापरवानगी असलेले बांधकाम नियमानुसार नियमानुकूल होत असल्यास कलम १४३ नुसार प्रशमन शुल्क आकारून जिल्हाधिकारी यांचेकडून नियमानुकूल करून घेणे आवश्यक राहील.
२. अनधिकृत बांधकाम केलेल्या इमारतीतील अनुज्ञेय मजल्यापेक्षा जास्त बांधलेल्या वाढीव मजल्यांसाठीची सवलत सक्षम प्राधिकरणाकडून मंजूर न झाल्यास ते वाढीव मजले अर्जदार/जागामालक यांनी स्वखर्चाने पाडावे लागतील.

३. सलग ४०% क्षेत्र क्रिडांगणासाठी सोडणे आवश्यक राहील.

(यापुढे ज्याचा उल्लेख " उक्त फेरबदल" असा करण्यात आला आहे.)

आणि ज्याअर्थी, महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम १९६६ (यापुढे ज्याचा उल्लेख " उक्त अधिनियम" असा करण्यात आला आहे) च्या कलम २० चे पोट कलम(३) मधील तरतुदींनुसार उक्त प्रादेशिक योजनेत उक्त फेरबदल करण्याचा हेतू शासन याद्वारे घोषित करीत आहे. उक्त फेरबदलाच्या अनुषंगाने जर काही सूचना/हरकती द्यावयाच्या असतील तर त्या नागरिकांनी लेखी स्वरूपात व योग्य कारणमिमांसेसह, ही नोटीस महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून ३०(तीस) दिवसांचे आत उपसंचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे सं.क्र.७४/२, सहकारनगर, बँक ऑफ महाराष्ट्राच्या वर, पुणे - ४११००९, यांचे नावे पाठवाव्यात, उपसंचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे, यांना प्राप्त होणाऱ्या सूचना/हरकतीवर संबंधितांना सुनावणी देण्यासाठी व अहवाल शासनास सादर करण्यासाठी प्राधिकृत करण्यात येत आहे.

ही नोटीस महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून ३०(तीस) दिवसांचे आंत आलेल्या सूचना/हरकतींचाच शासनाकडून विचार केला जाईल.

टिप :-

अ) उक्त प्रारूप फेरबदल दर्शविणारा भाग नकाशा नागरिकांच्या अवलोकनार्थ कामकाजाच्या दिवशी कार्यालयीन वेळेत खालील कार्यालयात उपलब्ध राहिल.

१) उपसंचालक, नगर रचना, पुणे विभाग, पुणे, स.क्र.७४/२, सहकारनगर, बँक ऑफ महाराष्ट्रच्या वर, पुणे-४११००९.
२) सहाय्यक संचालक, नगर रचना, कोल्हापूर शाखा, कोल्हापूर, १०९१, सी वॉर्ड, बिंदू चौक, कोल्हापूर-४१६००२.
३) जिल्हाधिकारी, कोल्हापूर.

ब) सदरहू सूचना शासनाच्या www.urban.maharashtra.gov.in वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( सुनिल मरळे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**NOTICE**
**Government of Maharashtra**
**Urban Development Department,**
**Mantralaya, Mumbai 400 032.**

**Date - 26.05.2011**

No.-TPS 2111/14/C.R.59/2011/UD-13

Maharashtra Regional & Town Planning Act 1966

Whereas the Regional Plan of Kolhapur-Ichalkaranji Region (hereinafter referred to as "the said Regional Plan" has been sanctioned by Government in Urban Development and Public Health Department vide Notification No.RPK/1176/2782/UD-5, dated 20th April, 1978 and has come into force with effect from 1st November, 1978 (hereinafter referred to as "the said Notification");

And whereas, as per the proposals of the said Regional Plan the land bearing Gat No.85, 199 & 200 of village Talsande, Tal.Hatkanangale (hereinafter referred to as the "said land") are included in Agriculture / No development zone (hereinafter referred to as the "said zone")

And whereas, Dr.D.Y.Patil Education Society, Kolhapur has requested to change the zoning of the lands bearing Gat No.85 & 199 of Village-Talsande, Tal-Hatkangale from Agriculture/No Development zone to Public-Semipublic zone for education purpose vide their letter dt.11/1/2011; and said society have also submitted NOC of the owners of G.No.200 as mentioned in 7/12 extract dtd.08/02/2011

And whereas, Government is of the opinion that for the balanced development of the region, the said lands shall be deleted from the "said zone" and included in Public-semipublic Zone as shown on plan attached herewith for educational purpose, subject to following conditions :-

1. The unauthorized construction which is liable to be regularized according to law, the owner/applicant shall get regularized it, from Collector, Kolhapur after depositing compounding charges under section 143 of the said act.
2. If the relaxation to unauthorized construction of building having floors more than G+1 is not approved by the Competent Authority, then upper floors more than permissible floors, shall have to be demolished by the applicant/owner at his own cost.

3. The contiguous 40% area of the land shall be kept for playground.

(hereinafter referred to as "the said modification")

Now therefore, as provided in sub-section (3) of section 20 of the Maharashtra Regional & Town Planning Act.1966 suggestions and objections, if any, to the said modification are invited from general public in writing with reasons thereof, within 30(thirty) days from the date of publication of this notice in Maharashtra Government Gazette. The suggestions/objections shall be addressed to the Deputy Director of Town Planning, Pune Division, Pune having his office at S.No.74/2, Sahakar Nagar, Above Bank of Maharashtra, Pune-411009, who is hereby authorized as an officer for giving hearing on suggestions/ objections & to submit his report to Government;

The suggestions/objections received within the period of 30(thirty) days from the date of publication of this notice in Maharashtra Government Gazette only will be considered.

Note :-

A) The plan showing the said draft modification is available for inspection by the general public during office hours on all working days at the following offices: -

1) Deputy Director of Town Planning, Pune Division, Pune, S.No.74/2, Sahakar Nagar, Above Bank of Maharashtra, Pune-411009.
2) Assistant Director of Town Planning, 1091, C Ward, Bindu Chowk, Kolhapur - 416002.
3) The Collector of Kolhapur.

B) This notice is also published on Government web site at www.urban.maharashtra.gov.in

By order and in the name of the Governor of Maharashtra,

( Sunil Marale )
Under Secretary to Government